**कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) राज्यस्तरीय निवड समिती, पुणे यांनी शिफारस केलेल्या कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) या पदावर प्रतिक्षायादीतील उमेदवारांची नियुक्तीसह पदस्थापना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती- २३२४/(प्र.क्र.४४/२४)/आ.(तांत्रिक)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
१५ मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० जून, २०२४.

**वाचा :-** १. सदस्य सचिव, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) राज्यस्तरीय निवड समिती तथा अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.रानिस/६८/२०२३, दि.०३.१०.२०२३.

२. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. नियुक्ती- १११८/(प्र.क्र.१८५/१८)/आ.(तांत्रिक) दि.२०.१०.२०२३, दि.२६.१०.२०२३ , दि.२७.१२.२०२३ व दि.२६.०२.२०२४.

३. कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) राज्यस्तरीय निवड समिती तथा अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.रानिस/१९/२०२४, दि.२/४/२०२४.

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयातील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील सरळसेवेने ५०० पदे भरण्यासाठी सन २०१९ मध्ये जाहिरात प्रसिध्द करण्यात आली होती. सदर भरती प्रक्रियेदरम्यान ४९५ उमेदवारांची निवड करण्यात आली. राज्यस्तरीय निवड समितीने गुणानुक्रमे व आरक्षण प्रवर्गानुसार १५६ उमेदवारांची प्रतिक्षायादी संकेतस्थळावर प्रसिध्द केली आहे. निवड झालेल्या उमेदवारांपैकी एकूण ४८६ उमेदवारांना शासन आदेश दि.२०.१०.२०२३ (४२९), दि.२६.१२.२०२३ (१० दिव्यांग), दि.२७.१२.२०२३ (४६ आदुघ), दि.२६.२.२०२४ (०१ खेळाडू) अन्वये नियुक्ती देण्यात आली. नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांपैकी काही उमेदवार रुजू झाले नाहीत, तसेच काही उमेदवार रूजू होऊन त्यांनी राजीनामा दिला आहे. सबब, रुजू न झालेल्या तसेच राजीनामा दिल्यामुळे रिक्त झालेल्या पदावर प्रतिक्षासूचीवरील ५८ उमेदवारांना नियुक्तीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (गट-ब अराजपत्रित) या पदावर शिफारस प्राप्त उमेदवारांमधून परिशिष्ट “अ” मध्ये दर्शविलेल्या ५८ उमेदवारांची कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (गट-ब अराजपत्रित) या पदावर सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतनस्तर एस-१५ मध्ये जलसंपदा विभागात ते ज्या दिवशी रुजू होतील त्या दिनांकापासून विहीत अटी व शर्तीच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. सदर नियुक्ती ही मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल असलेल्या एसएलपी क्र.००३६७४/२०२३ प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून तसेच खाली नमूद विहित अटी /शर्तीच्या अधिन असेल:-

(१) कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) या पदावर निवड झालेल्या उमेदवारांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१ लागू राहील. सदर नियमावलीतील

तरतुदीनुसार संबंधित उमेदवारांना परिशिष्ट-"अ" प्रमाणे त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या पदावर महसूली विभाग वाटप करुन, वाटप करण्यात आलेल्या महसूली विभागातील रिक्त पदावर नागरी सेवा मंडळाने शिफारस केल्यानुसार पदस्थापना करण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित उमेदवारांनी पदस्थापनेच्या ठिकाणी विहित मुदतीत रुजू होणे बंधनकारक आहे. सदर उमेदवारांना देण्यात आलेल्या पदस्थापनेत कोणताही बदल होणार नाही.

(२) सोबतच्या "परिशिष्ट-अ" मधील उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत तात्काळ रुजू व्हावे. सदर विहित कालावधीत उमेदवार रुजू झाला नाही तर तो नोकरीची संधी गमावेल व त्याचा नियुक्ती करिता विचार करण्यात येणार नाही, ते नियुक्ती स्विकारण्यास इच्छुक नाहीत, असे गृहित धरण्यात येईल व त्यांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील व त्यांचा नियुक्तीकरीता कोणत्याही परिस्थितीत विचार करण्यात येणार नाही. तसेच उमेदवारांकडून देण्यात येणाऱ्या कोणत्याही कारणांचा/विनंतीचा विचार केला जाणार नाही.

(३) उमेदवारांच्या रुजू होण्याच्या मुदतवाढीच्या विनंती संदर्भात सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन) नियमावली-२०२१ शासन अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/१२, दिनांक २१.०६.२०२१ मधील तरतूदीनुसार तसेच याबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या निर्देशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

(४) कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), (गट-ब अराजपत्रित) या संवर्गातील निवड झालेल्या उमेदवारांची ज्येष्ठता महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतूदीनुसार निश्चित करण्यात येईल.

(५) (अ) मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांच्याबाबत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यासाठी व जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यास अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: बीसीसी-२०१२/प्र.क्र.३३२/१२/१६-ब, दिनांक १८.५.२०१३ मध्ये नमूद सुचनांनुसार तसेच याबाबत शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचनांनुसार संबंधित मुख्य अभियंता यांनी कार्यवाही करावी. मागासवर्गीयांसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ मधील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधिन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. सदरहू उमेदवाराकडे जात पडताळणी समितीकडून प्राप्त करुन घेतलेले जाती वैधता प्रमाणपत्र असल्यास त्याने नियुक्तीसाठी हजर होताना ते सादर करावे. जातपडताळणी प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे ही संबंधित उमेदवाराची जबाबदारी असल्यामुळे वैधता प्रमाणपत्र नसल्यास उमेदवाराने जाती प्रमाणपत्र पडताळणीसाठी आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे / प्रमाणपत्रे संबंधित मुख्य अभियंता यांना तसेच जात प्रमाणपत्र पडताळणी समितीस विहीत अर्ज व कार्यपध्दतीनुसार सादर करावीत.

(ब) विहित कार्यपध्दतीनुसार संबंधित मुख्य अभियंता यांनी विनाविलंब सदर कागदपत्रे संबंधित जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे सादर होतील तसेच समितीकडून सदर प्रमाणपत्र प्राप्त होईल यासाठी पाठपुरावा करावा. याशिवाय संबंधित उमेदवाराने देखील स्वतंत्रपणे जात पडताळणी समितीकडे त्याच्याकडे असलेले कागदपत्रे / पुरावे सादर करुन ६ महिन्याच्या आत जातवैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे. जात पडताळणी समितीकडून जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. तसेच, शिफारस करण्यात आलेल्या सर्व

उमेदवारांचे जाती दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांच्याकडून अथवा संबंधित जात प्रमाणपत्र पडताळणी समिती व जमातीचे दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून अथवा संबंधित जात वैधता प्रमाणपत्र पडताळणी समितीकडून सदर आदेश निर्गमित झाल्यापासून ६ महिन्याच्या आत तपासून घ्यावे व सदर प्रमाणपत्र संबंधित समितीकडून निर्गमित करण्यात आल्याची खातरजमा करुन घेण्याची कार्यवाही संबंधित मुख्य अभियंता यांनी करावी.

(६) इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाच्या दि. ३१-०१-२०२० च्या शासन निर्णयानुसार खुल्या प्रवर्गातील महिला, विजाभज, इमाव व विमाप्रवर्गातील व्यक्ती आणि आर्थिकदृष्ट्या दुर्बल प्रवर्ग या प्रवर्गातील प्रगत व उन्नत गटात समाविष्ट नसलेल्या व्यक्तिंना सक्षम प्राधिकारी यांनी निर्गमित केलेल्या Non Creamy Layer प्रमाणपत्राच्या वैधता पडताळणीसाठी राज्यातील प्रादेशिक महसूली विभाग स्तरावर "विभागीय आयुक्त" यांच्या अध्यक्षतेखाली Non Creamy Layer प्रमाणपत्र (उत्पन्नाच्या दाखल्याची) वैधता पडताळणी समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीकडून महिलांच्या आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या महिला उमेदवारांचे तसेच अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांचे उन्नत व प्रगत गटात (क्रीमिलेयर) मोडत नसल्याचे सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या Non Creamy Layer प्रमाणपत्राची वैधता संबंधित मुख्य अभियंता यांनी उपरोक्त नमूद शासन निर्णयातील तरतुदीनुसार तपासून घेण्याची कार्यवाही करावी.

(७) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.अपंग १००३/प्र.क्र.१२७/ २००३/१६-अ, दिनांक ०६-०५-२००४ मधील बाब क्र. (६) नुसार त्यांच्या नेमणुकीपूर्वी उमेदवार संबंधित पदावर नियुक्तीसाठी सक्षम आहे किंवा नाही याची वैद्यकीय मंडळाकडून तपासणी केल्यानंतर ते नेमणुकीस पात्र ठरतात. दिव्यांगांसाठी राखीव असलेल्या पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक:अप्रकि २०१२/प्र.क्र.२९७/आरोग्य-६, दि. ०६.१०.२०१२ मधील आदेशानुसार SADM या नवीन संगणक प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेले नवीन नमुन्यातील दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अप्रवि-२०१८/ प्र.क्र.४६/आरोग्य-६, दि.१४.०९.२०१८ मधील आदेशानुसार केंद्र शासनाच्या www.swavlambancard.gov.in या संगणकीय प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेले नवीन नमुन्यातील किमान ४०% कायमस्वरुपी दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र शासनास नियुक्तीपूर्वी सादर करणे अनिवार्य आहे. तसेच दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ च्या आधारे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. दिव्यांग-२०१८/प्र.क्र.११४/१६अ, दिनांक २९ मे, २०१९ तसेच या संदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात आलेल्या आदेशानुसार आरक्षणासंदर्भातील कार्यवाही करण्यात यावी. तसेच खाली नमूद करण्यात आलेल्या शासन निर्णय / परिपत्रकांमधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात येईल :

(अ) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : अपंग १००३/प्र.क्र.१२७/ २००३/१६-अ, दिनांक ६.५.२००४.

(ब) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र२००९/प्र.क्र.९/सुधार-३, दिनांक ३.८.२०१०.

(क) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अपंग २००९/प्र.क्र.१३३/सुधार -३, दिनांक १४.१.२०११.

(ड) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अप्रकि २०१२/प्र.क्र.२९७/ आरोग्य-६, दिनांक ६.१०.२०१२.

(इ) दिव्यांग प्रवर्गातील पात्र उमेदवारांची जेष्ठता महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतूदीनुसार करण्यात येईल.

(८) ज्या मागासवर्गीय उमेदवारांची खुल्या प्रवर्गातील पदावर शिफारस करण्यात आली असेल त्या उमेदवारांबाबत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक: सीबीसी-१०/२००४/प्र.क्र.५७०/मावक-५, दिनांक १६.५.२००७ मधील सूचनेनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(९) हिंदी व मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर शिफारसप्राप्त उमेदवार अगोदर उपरोक्त नमुद परीक्षा उत्तीर्ण झाला नसेल किंवा त्याला सदरहू परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर, सदरहू उमेदवारांना ती परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(१०) कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या उमेदवाराकडे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९.३.२००३ मधील तरतुदीनुसार (अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत -C.C.C.◦ किंवा -O◦ स्तर किंवा -B◦ किंवा -C◦ स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा (ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक प्रमाणपत्र किंवा माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९, दिनांक ०४.०२.२०१३ व शासन पूरकपत्र दिनांक ०८.०१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार आवश्यक संगणक अर्हता आवश्यक आहे. तथापि, नियुक्ती स्विकारण्याच्या वेळेस सदर प्रमाणपत्र / अर्हता उमेदवारांकडे नसल्यास नियुक्ती स्विकारल्यापासून दोन वर्षाच्या आत उमेदवाराने उपरोक्त शासन निर्णयातील नमूद संस्थेचे संगणक ज्ञानाच्या अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. या विहित कालावधीत उमेदवाराने सदर प्रमाणपत्र सादर न केल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.४६२/कार्या. १२, दिनांक २८-०५-२०१८ तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(११) प्रस्तुत उमेदवारांची नियुक्ती त्यांच्या पूर्व चारित्र्याची पडताळणी करण्यापूर्वी करण्यात येत असल्यामुळे त्यांची नियुक्ती पुढील आदेश होईपर्यंत करण्यात आली आहे. चारित्र्य पडताळणी अहवाल प्रतिकूल आढळल्यास त्याची सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल. मुख्य अभियंता यांनी उमेदवारांच्या चारित्र्य पडताळणीची कार्यवाही करावी. सदर कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.चारित्र्य-२११७/प्र.क्र.४८३/२०१७/१६-अ, दि.२८.८.२०१७ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक चापअ १००८ / प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दिनांक ९.१.२००९ व सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्र.चापअ १०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दिनांक २६.८.२०१४ मधील सूचनादेखील विचारात घेण्यात याव्यात.

(१२) उमेदवारांनी कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) या पदासाठी विहित केलेली व्यावसायिक परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

(१३) उमेदवारांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास तसेच, त्याचे काम किंवा वर्तणूक अयोग्य अथवा अनुरुप / असमाधानकारक आढळल्यास , तो सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

(१४) परिशिष्ट- अ येथे नमूद उमेदवारांनी संबंधित वैद्यकीय मंडळांकडून वैद्यकीय तपासणी अहवाल महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती नियम) १९८१ मधील नियम ११(१) अन्वये नियुक्ती

होण्यापूर्वी किंवा नियुक्तीच्या तारखेपासून त्याची सहा महिन्याची सेवा पूर्ण होण्यापूर्वी, यापैकी जे अगोदर घडेल त्याप्रमाणे वैद्यकीय प्रमाणपत्र दाखल करणे बंधनकारक राहील, या अटीस अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. सहा महिन्यांच्या आत वैद्यकीय तपासणी अहवाल प्राप्त न झाल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल. तसेच, वैद्यकीय तपासणी अहवाल असमाधानकारक असल्यास त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता १ महिन्याची नोटीस देऊन समाप्त करण्यात येईल.

(१५) परिशिष्ट-अ येथील उमदेवारांना त्यांनी सादर केलेल्या प्रमाणपत्राच्या सत्यासत्यतेबाबतचा अहवाल संबंधित समितीकडून शासनास प्राप्त होण्याच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

(१६) शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/०८/२००९ मधील तरतुदीनूसार दि.०१/११/२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.०१/११/२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि.०१/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर नविन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२/०१/२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. वित्त विभाग शासन परिपत्रक दि.१२.१.२००७ नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल अशा शासकीय कर्मचाऱ्यास नविन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल.

(१७) "परिशिष्ट-अ" मधील उमेदवारांना शासन सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास, त्यांना शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ लेखी सूचना किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. यासंदर्भातील राजीनामा स्विकारण्याचे अधिकार केवळ नियुक्ती प्राधिकारी (शासन) यांना असतील. क्षेत्रिय कार्यालयांनी परस्पर प्रशिक्षणार्थ्याचा राजीनामा स्विकृत करु नये किंवा मंजूर करु नये. तथापि, राजीनामा दिल्यानंतर पुन्हा राजीनामा मागे घ्यावयाचा असल्यास, त्यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो २०१९/प्र.क्र.४७०/सेवा-४, दिनांक ०९.०५.२०२२ मधील तरतूदी लागू राहतील.

मात्र, गैरवर्तणूक, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी पूर्वसूचना देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

(१८) "परिशिष्ट-अ" येथील उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत असणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या दुसऱ्या पदावर उमेदवार म्हणून नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदावरील वेतननिश्चिती ही शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : वेतन १२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दिनांक २३.०३.१९९४ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

तर "परिशिष्ट §अ" मधील उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत नसणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या परिवीक्षाधीन उमेदवार म्हणून नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदावरील वेतननिश्चिती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

(१९) परिशिष्ट-अ मधील उमेदवार सध्या केंद्र/राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेत कार्यरत असतील तर संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीच्या ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र सादर केल्याशिवाय त्यांना रुजू करुन घेता येणार नाही. तसेच उमेदवारांची नियुक्ती त्यांचे केंद्र/राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेतील ना-चौकशी प्रमाणपत्र त्यांच्या संबंधित कार्यालयाकडून प्राप्त होण्याच्या अधिन राहील.

२. कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) या पदावर देण्यात येणारी तात्पुरती नियुक्ती ही पूर्वचारित्र्य पडताळणी, वैद्यकीय तपासणी, जात वैधता प्रमाणपत्र, नॉन क्रिमीलीयर प्रमाणपत्र तसेच महिला, खेळाडू, अनाथ व दिव्यांग इ. घटकांसाठी असलेल्या आरक्षण, तसेच हिंदी व मराठी आणि संगणक यासाठी शासनाच्या प्रचलित आदेशातील तरतुदी लागू राहतील. तसेच शासन निर्णय समक्रमांक दि.२० ऑक्टोबर, २०२३ मधील इतर अनुषंगिक अटी व शर्ती लागू राहतील.

३. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी नियुक्तीच्या/पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता विशिष्ट ठिकाणी पदस्थापना/ नियुक्ती मिळविण्यासाठी मा. लोकप्रतिनिधी/ खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित उमेदवारांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

४. या आदेशानुसार पदस्थापना देण्यात आलेल्या उमेदवारांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. त्याबाबतचा एकत्रित अहवाल संबंधित मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता यांनी ४ दिवसांच्या आत शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२०१६०७५९८९२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANGESH RAMDAS BAGDE
Digitally signed by MANGESH RAMDAS BAGDE
DN: CN = MANGESH RAMDAS BAGDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2024.06.20 16:25:32 +05'30'

**( मंगेश बागडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत :- परिशिष्ट "अ"**

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. महालेखापाल-१/२, लेखापरीक्षा, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
३. मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अध्यक्ष, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) राज्यस्तरीय निवड समिती तथा मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे.
५. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
७. अ.मु.स.(जलसंपदा)/ सचिव (प्रकल्प समन्वय)/ सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. संबंधित उमेदवार (राज्यस्तरीय निवड समितीमार्फत)
९. कार्यासन (आ (शा.अ.)/ दक्षता-१/२/३), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती आ (तांत्रिक)

शासन निर्णय क्र. नियुक्ती-२३२४/प्र.क्र.४४/आस्था (तांत्रिक), दि.२० जून, २०२४ सोबतचे

परिशिष्ट-अ

कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) पदाकरिता प्रथम प्रतिक्षायादीमधील ५८ उमेदवारांची सविस्तर पदस्थापना

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव | नियुक्ती प्रवर्ग | नियुक्तीसाठी प्रस्तावित पदस्थापना | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | प्रदेश कार्यालय | प्रस्तावित सविस्तर पदस्थापना |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १८६ | रामिज रियाज फरास | खुला | मुख्य अभियंता (स्थापत्य) जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण, पुणे | अधीक्षक अभियंता,गुण नियंत्रण मंडळ, पुणे अंतर्गत कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग,कोल्हापूर अंतर्गत गुण नियंत्रण उपविभाग, निढोरी |
| २ | १८७ | सागर राजेश निजामपुरे | खुला | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, छ.संभाजीनगर | अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड अंतर्गत कार्यकारी अभियंता, नांदेड पाटबंधारे विभाग (दक्षिण) अंतर्गत मानार प्रकल्प पाटबंधारे उपविभाग,बारुळ |
| ३ | १८८ | मुफितुर्रहमानवाहेद नवाबसाब शेखदार | खुला | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग,छ.संभाजीनगर | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत कार्यकारी अभियंता,जायकवाडी पाटबंधारे विभाग नाथनगर (उ) पैठण |
| ४ | १९२ | अतुल विवेक पाटील | खुला | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ५ | २०४ | अथर्व चंद्रशेखर देवकर | खुला | मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग,पुणे | अधीक्षक अभियंता, सातारा पाटबधारे प्रकल्प मंडळ,सातारा अंतर्गत कार्यकारी अभियंता, धोम बलकवडी विभाग,वाई अंतर्गत धोम बलवकडी उपविभाग क्र.७,खडाळा |
| ६ | २०७ | प्रशंजित विमल ढाली | खुला | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता, नागपूर पाटबंधारे मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग, गोंदिया |
| ७ | २११ | ऋषिकेश रघुनाथ ढेरे | खुला | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता सातारा सिंचन मंडळ सातारा अंतर्गत कोयना सिंचन विभाग, कोयनानगर |
| ८ | २१६ | गव्हाणे धनंजय सुभाष | खुला | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, छ.संभाजीनगर | अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड अंतर्गत कार्यकारी अभियंता, नांदेड पाटबंधारे विभाग (उत्तर) अंतर्गत बाभळी पाटबंधारे उपविभाग, उमरी |
| ९ | २२५ | अतुल मारुती सुरवसे | खुला | मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग,पुणे | अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ,सोलापूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र.८,सोलापूर |
| १० | २२९ | विनय अडागोंडा नांद्रेकर | खुला | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे अंतर्गत भामा आसखेड धरण विभाग अंतर्गत कलमोडी प्रकल्प उपविभाग कडधे वसाहत |
| ११ | २३२ | अजय भगवान गर्जे | खुला | मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग,पुणे | अधीक्षक अभियंता, सातारा पाटबधारे प्रकल्प मंडळ,सातारा अंतर्गत कार्यकारी अभियंता, धोम बलकवडी विभाग,वाई |
| १२ | २४३ | संकेत सुभाष हसाबे | खुला | मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे अंतर्गत कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१, पंढरपूर अंतर्गत सांगोला शाखा कालवा प्रकल्प उपविभाग क्र.२, सांगोला |
| १३ | २८३ | अक्षय मारुती सानप | खुला | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| १४ | २९४ | गिरीश सोमनाथ गाडवे | खुला | मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबधारे मंडळ, कोल्हापूर (मंडळ कार्यालय) |
| १५ | ३०२ | ओंकार दिनकर जाधव | खुला | मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत ताकारी म्हैसाळ उपसा सिंचन व्यवस्थापन विभाग सांगली अधिनस्त म्हैसाळ उपसा सिंचन व्यवस्थापन उपविभाग क्र.२ बेळंकी. |

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव | नियुक्ती प्रवर्ग | नियुक्तीसाठी प्रस्तावित पदस्थापना | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | प्रदेश कार्यालय | प्रस्तावित सविस्तर पदस्थापना |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १६ | ३०५ | राहुल जगन्नाथ सरोदे | खुला | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, छ.संभाजीनगर | अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, परळी वैजनाथ अंतर्गत कार्यकारी अभियंता, लातूर लघु पाटबंधारे विभाग, लातूर अंतर्गत लघु पाटबंधारे उपविभाग, लातूर. |
| १७ | ३१९ | ऋतुराज अरुण पाटील | खुला | मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग,पुणे | अधीक्षक अभियंता, सातारा पाटबधारे प्रकल्प मंडळ,सातारा अंतर्गत कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र.२,करवडी अंतर्गत कण्हेर शेतचारी अस्तरीकरण उपविभाग,कोरेगांव |
| १८ | ३२८ | अथर्व शिवाजीराव घुगे | खुला | मुख्य अभियंता (स्थापत्य) जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण, पुणे | अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, अमरावती अंतर्गत नियंत्रण उपविभाग, यवतमाळ |
| १९ | ३४१ | अवधूत अनिल राऊत | खुला | मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे अंतर्गत भामा आसखेड धरण विभाग, पुणे अंतर्गत टेमघर प्रकल्प उपविभाग क्र.२, टेमघर |
| २० | ३४३ | ज्ञानेश्वर विश्वंभर देशमुख | खुला | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग,छ.संभाजीनगर | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, बीड अंतर्गत कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग क्र.३ बीड अंतर्गत पाटबंधारे उपविभाग आष्टी अंतर्गत सिंचन शाखा, आष्टी |
| २१ | ३४८ | ओंकार भास्कर गायकवाड | खुला | मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे अंतर्गत कार्यकारी अभियंता, भामा आसखेड धरण विभाग, पुणे अंतर्गत भामा आसखेड धरण उपविभाग क्र.४, करंजविहीरे |
| २२ | ३५० | संदिप नंदकिशोर चव्हाण | खुला | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, छ.संभाजीनगर | अधीक्षक अभियंता, धाराशिव पाटबंधारे मंडळ, धाराशिव अंतर्गत कार्यकारी अभियंता, कृष्णा मराठवाडा बांधकाम पाटबंधारे विभाग क्र.१, धाराशिव अंतर्गत कृष्णा मराठवाडा बांधकाम पाटबंधारे उपविभाग क्र.३, भूम. |
| २३ | ३५२ | किरण प्रभाकर मोरे | खुला | मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग,पुणे | अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,सोलापूर अंतर्गत उजनी धरण व्यवस्थापन विभाग,भीमानगर अंतर्गत भीमा उपसा सिंचन उपविभाग क्र.१,करमाळा अंतर्गत भीमा उपसा सिंचन शाखा,जिंती |
| २४ | ३५६ | अजय आनंदा देसाई | खुला | मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ,कोल्हापूर अंतर्गत कोल्हापूर पाटबंधारे विभाग (दक्षिण), कोल्हापूर अंतर्गत चंदगड पाटबंधारे उपविभाग, चंदगड |
| २५ | ३५७ | सारंगधर आसाराम मोटे | खुला | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग,छ.संभाजीनगर | अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, बीड अंतर्गत कार्यकारी अभियंता, माजलगांव पाटबंधारे विभाग परळी वै . अंतर्गत पाटबंधारे उपविभाग, तेलगांव अंतर्गत सिंचन शाखा सिरसाळा |
| २६ | ३५९ | अक्षय सुरेश बोबडे | खुला | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, पेंच पाटबंधारे विभाग, नागपूर अंतर्गत पेंच नुतनीकरण उपविभाग नागपूर (मुख्यालय-मौदा) अंतर्गत पेंच पाटबंधारे शाखा रेवराल |
| २७ | ३६० | अनिकेत जालिंदर चव्हाण | खुला | मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत टेंभू उपसा सिंचन प्रकल्प व्यवस्थापन विभाग ओगलेवाडी अधिनस्त टेंभू उपसा सिंचन प्रकल्प उपविभाग क्र ५, कडेपूर |
| २८ | ३६१ | चैतन्य मधुकर लोले | खेळाडू ऐवजी खुला | मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग,पुणे | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,सोलापूर अंतर्गत भीमा विकास विभाग क्र.२,सोलापूर अंतर्गत भीमा पाटबंधारे उपविभाग,अकोली अंतर्गत भीमा पाटबंधारे शाखा क्र.९,करकंब |
| २९ | ३६६ | अजय खुलास सुर्यवंशी | खेळाडू ऐवजी खुला | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, छ.संभाजीनगर | अधीक्षक अभियंता, छ.संभाजीनगर पाटबंधारे मंडळ, छ.संभाजीनगर अंतर्गत कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१, छ.संभाजीनगर अंतर्गत पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.८ छ.संभाजीनगर |

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव | नियुक्ती प्रवर्ग | नियुक्तीसाठी प्रस्तावित पदस्थापना | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | प्रदेश कार्यालय | प्रस्तावित सविस्तर पदस्थापना |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ३० | ३६७ | अभिजित नामदेव वायसे | खेळाडू ऐवजी खुला | मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता पुणे पाटबंधारे मंडळ,पुणे अंतर्गत पुणे पाटबंधारे विभाग, पुणे अंतर्गत नीरा डावा कालवा पाटबंधारे उपविभाग निमगाव अंतर्गत निमगांव पाटबंधारे शाखा क्र.१, निमगांव |
| ३१ | ३६९ | अक्षय सुरेशराव वानखेडे | खेळाडू ऐवजी खुला | मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग,पुणे | अधीक्षक अभियंता, कुकडी सिंचन मंडळ,पुणे अंतर्गत कुकडी पाटबधारे विभाग क्र.१, नारायणगांव अंतर्गत कुकडी पाटबंधारे उपविभाग क्र.२, नारायणगांव अंतर्गत मीना सिंचन शाखा, नारायणगांव. |
| ३२ | ३७० | संदिप भाऊसाहेब ढाले | खेळाडू ऐवजी खुला | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ३३ | ३७१ | अभिजीत भाऊसाहेब राऊळ | खेळाडू ऐवजी खुला | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ३४ | ३७२ | योगेश सदाशिव पाटील | इमाव | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ३५ | ३७३ | अतुल सुधाकर दोनाडकर | इमाव | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता, गोसीखुर्द उपसा सिंचन मंडळ,आंबाडी अंतर्गत कार्यकारी अभियंता, गोसीखुर्द उपसा सिंचन विभाग, आंबाडी |
| ३६ | ३७४ | सरताज अमीरहामजा मुल्ला | इमाव | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत उपसा सिंचन व्यवस्थापन विभाग, पुणे अंतर्गत जनाई शिरसाई उपसा जलसिंचन व्यवस्थापन उपविभाग, दौंड अंतर्गत जनाई शिरसाई उपसा सिंचन शाखा, कुसेगाव |
| ३७ | ३७५ | हितेश योगराज पाटील | इमाव | मुख्य अभियंता (विप्र),जलसंपदा विभाग,पुणे | अधीक्षक अभियंता, कुकडी सिंचन मंडळ,पुणे अंतर्गत कुकडी पाटबधारे विभाग क्र.२,श्रीगोंदा अंतर्गत घोड पाटबंधारे उपविभाग,शिरुर अंतर्गत घोड धरण शाखा चिंचणी |
| ३८ | ३७६ | संदेश अशोक भोसले | आदुघ | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे | अधीक्षक अभियंता पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे अंतर्गत पणदरे पाटबंधारे उपविभाग माळेगांव वसाहत अंतर्गत पणदरे पाटबंधारे शाखा, पणदरे |
| ३९ | ३७७ | रोहित गोरक्षनाथ भोर | आदुघ | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ४० | ३७८ | मनोज प्रकाश फुसे | खेळाडू ऐवजी इमाव | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती | अधीक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे प्रकल्प मंडळ, यवतमाळ संलग्न संकल्प चित्र, यवतमाळ |
| ४१ | ३८० | दिपक भिकाजी पाटील | आदुघ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, नागपूर पाटबंधारे विभाग (दक्षिण), नागपूर अंतर्गत पाटबंधारे उपविभाग, हिंगणघाट अंतर्गत शाखा समुद्रपुर-१ |
| ४२ | ३८२ | अक्षय भगवान काटे | आदुघ | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ४३ | ३८३ | मनोज तुकाराम मांजरे | आदुघ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती | अधीक्षक अभियंता, यवतमाळ सिंचन मंडळ, यवतमाळ अंतर्गत कार्यकारी अभियंता, अरूणावती पाटबंधारे विभाग, दिग्रस अंतर्गत अडाण पाटबंधारे कालवे उपविभाग क्र.२, दारव्हा |

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव | नियुक्ती प्रवर्ग | नियुक्तीसाठी प्रस्तावित पदस्थापना | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | प्रदेश कार्यालय | प्रस्तावित सविस्तर पदस्थापना |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ४४ | ३८५ | अमिनुद्दीन मुबारक शेख | आदुघ | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ४५ | ३८७ | सनिकेत मारुती यादव | खेळाडू ऐवजी आदुघ | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ४६ | ३८८ | शशिकांत कैलास लबडे | खेळाडू ऐवजी आदुघ | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ४७ | ४६७ | तृषभ रामेश्वर मोटघरे | PH-C (OBC) | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता, नागपूर पाटबंधारे मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, वर्धा अंतर्गत आजणसरा प्रकल्प उपविभाग क्र.१, हिंगणघाट. |
| ४८ | ६८१ | धनंजय लीलाधर विरुळकर | अनुसूचित जाती | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती | अधीक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा सिंचन मंडळ, अमरावती अंतर्गत अमरावती पाटबंधारे विभाग, अमरावती अतर्गत अमरावती पाटबंधारे उपविभाग क्र.२,अमरावती (मु.धामणगांव) |
| ४९ | ८६९ | श्वेता सतीशकुमार धायगुडे | खुला महिला | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती | अधीक्षक अभियंता, जिगांव प्रकल्प पाटबंधारे मंडळ, शेगांव अंतर्गत जिगांव धरण व पुनर्वसन विभाग, शेगाव अंतर्गत जिगांव पुनर्वसन उपविभाग क्र.३, शेगाव |
| ५० | ९०२ | श्वेता संजयराव चोपडे | खुला महिला | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे विभाग, चंद्रपूर अंतर्गत लभानसराड पोथरानाला पाटबंधारे उपविभाग, वरोरा. |
| ५१ | ९५२ | पूजा कृष्णराव वाळके | खुला महिला | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, गोसीखुर्द धरण विभाग, वाही (पवनी) अंतर्गत गोसीखुर्द उजवा कालवा उपविभाग क्र.१४, नागभीड |
| ५२ | ९६३ | प्रणाली कार्तिकस्वामी क्षीरसागर | इमाव महिला | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता, भंडारा सिंचन मंडळ, भंडारा अंतर्गत कार्यकारी अभियंता, भंडारा पाटबंधारे विभाग, भंडारा अंतर्गत बावनथडी पाटबंधारे उपविभाग, बघेडा. |
| ५३ | ९९१ | निकिता विश्वास पाटील | आदुघ महिला | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, गोसीखुर्द उजवा कालवा विभाग, ब्रम्हपूरी अंतर्गत गोसीखुर्द उजवा कालवा उपविभाग क्र.५, ब्रम्हपूरी |
| ५४ | १०६६ | वृषाली सुनील दंडनाईक | आदुघ महिला | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग,छ.संभाजीनगर | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, बीड अंतर्गत कार्यकारी अभियंता, माजलगांव पाटबंधारे विभाग परळी वै . अंतर्गत पाटबंधारे उपविभाग, तेलगांव अंतर्गत सिंचन शाखा तेलगांव |
| ५५ | १३७८ | शीतल संजय भागवत | अनुसूचित जाती महिला | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ५६ | १७३७ | स्वप्नील भगवान बुरुड | अनुसूचित जमाती | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |
| ५७ | १७५४ | रामेश्वर नबाजी कोंडलवाडे | अनुसूचित जमाती | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता, भंडारा सिंचन मंडळ, भंडारा अंतर्गत कार्यकारी अभियंता, बाघ इटियाडोह पाटबंधारे विभाग, गोंदिया अंतर्गत बाघ पाटबंधारे उपविभाग, गोंदिया अंतर्गत शाखा कामठा. |

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव | नियुक्ती प्रवर्ग | नियुक्तीसाठी प्रस्तावित पदस्थापना | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | प्रदेश कार्यालय | प्रस्तावित सविस्तर पदस्थापना |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ५८ | १८३१ | हृषिकेश दत्तात्रय लिलके | खेळाडू ऐवजी अनुसूचित जमाती | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयात रुजू अहवाल सादर करावा सविस्तर पदस्थानेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. |

MANGESH RAMDAS BAGDE

Digitally signed by MANGESH RAMDAS BAGDE
DN: CN = MANGESH RAMDAS BAGDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2024.06.20 16:25:57 +05'30'

(मंगेश बागडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन